गृह (परिवहन) विभागामधील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिका-यांच्या बदल्या.

**महाराष्ट्र शासन**
**गृह (परिवहन) विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एमव्हीडी-०३१५/प्र.क्र.७०/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १९ ऑक्टोबर, २०१५.

**संदर्भ** - शासन आदेश क्र. एमव्हीडी-०३१५/प्र.क्र.७०/परि-४, दि. २७/०४/२०१५.

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(५) मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिका-यांच्या खालील तक्यात नमूद केल्याप्रमाणे बदल्या करण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक - ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | श्री. खंडेराव मारुतराव देशमुख | औरंगाबाद | ठाणे | दि. २७/०४/२०१५ रोजीच्या बदली आदेशातील श्री. खंडेराव देशमुख यांची बदली रद्द करुन. |

२. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली नंतरच्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्विकारावा. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता संबंधीत प्रादेशिक / उप प्रादेशिक परिवहन अधिकाऱ्यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे:-

अ) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर पर्यायी अधिकारी हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या अधिका-यांना तात्काळ कार्यमुक्त करावे.

ब) बदली झालेले अधिकारी त्यांच्या सध्याच्या पदावरुन कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. सदर अधिकाऱ्याला

रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाकाळ निर्माण झाल्यास देय होणाऱ्या वेतन व भत्त्यासाठी संबंधित अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

क) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यास पात्र ठरतील.

३. संबंधीत अधिकाऱ्यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू व्हावे व पदभार स्विकारल्याचा अहवाल परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१९१६५०३४९२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

M B Tashildar

Digitally signed by M B Tashildar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=M B Tashildar
Date: 2015.10.21 12:59:28 +05'30'

**(मो.बा. ताशिलदार)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री / राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
४) प्रादेशिक परिवहन अधिकारी, प्रादेशिक परिवहन कार्यालय, औरंगाबाद / ठाणे.
५) संबंधित सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी (परिवहन आयुक्त यांचे मार्फत)
६) अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/ ठाणे.
८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९) निवड नस्ती / परि-४